**महाराष्ट्र विद्युत व यांत्रिकी अभियांत्रिकी सेवा मुख्य परिक्षा २०२२ मधील सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत व यांत्रिकी) गट-ब या पदावरील नियुक्ती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती २०२३ /प्र.क्र. १४५ (२) भाग-८/आ(स.अ.श्रे-२)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
३ रा मजला,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ७ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :** जलसंपदा विभाग, शा. नि. क्र. नियुक्ती-२०२३/प्र.क्र.१४५(१)/आ(स.अ.श्रे-२), दि.१५.०३.२०२४

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र विद्युत व यांत्रिकी अभियांत्रिकी सेवा मुख्य परिक्षा २०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत व यांत्रिकी) या गट-ब पदांकरिता शिफारस केलेल्या ४९ उमेदवारांपैकी नियुक्तीसाठी पात्र असलेल्या ४७ उमेदवारांची संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत व यांत्रिकी) या गट-ब या पदावर जलसंपदा विभागात ते ज्या दिवशी रूजू होतील त्या दिनांकापासून दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात आली होती.

२. संदर्भाधीन शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. ३(२) अन्वये “परिविक्षाधीन उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत तात्काळ रूजू व्हावे. सदर विहीत कालावधीत उमेदवार रूजू झाला/ झाली नाही तर तो/ती नोकरीची संधी गमावेल व त्याच्या नियुक्तीकरिता विचार करण्यात येणार नाही. ते वरील पदावर इच्छुक नाहीत, असे गृहीत धरण्यात येईल व त्यांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील.” अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

३. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये नियुक्ती दिलेल्या ४७ उमेदवारांपैकी, सोबतच्या “परिशिष्ट अ” मधील नमूद ७ उमेदवार हे रूजू होण्यास दिलेल्या विहित कालावधीमध्ये (नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत/ रूजू होण्यास अंतिम मुदतवाढ दिलेल्या दिनांकापर्यंत) त्यांना पदस्थापना दिलेल्या ठिकाणी रूजू झालेले नाहीत. यास्तव, सोबतच्या “परिशिष्ट अ” मधील नमूद ०७ उमेदवारांची संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत व यांत्रिकी) या गट-ब या पदावर करण्यात आलेली तात्पुरती नियुक्ती या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०७१४४९००३७२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: CN = ANIL VITTHAL DEOKATE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2024.08.07 15:04:34 +05'30'

**(अनिल वि. देवकाते)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित उमेदवार यांना ई-मेल संदेशाद्वारे.

**प्रत :-**

१. अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. सचिव, मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
६. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
७. मुख्य अभियंता (विद्युत),जलसंपदा विभाग, मुंबई.
८. महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. उप सचिव (सेवा)/(प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी, कार्यासन (आ(संनि)/आ(वर्ग-२)/गोपनीय/नोंदणी शाखा, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३. संग्रहार्थ/कार्यासन आ(स.अ. श्रे-२)

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक : नियुक्ती २०२३/प्र.क्र. १४५(२)भाग-८/आ (स.अ.श्रे.२), दिनांक ७ ऑगस्ट, २०२४ सोबतचे विवरणपत्र

"परिशिष्ट -अ"

| अ.क्र. | मलोआ गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नांव | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | म.लो.आ. शिफारस प्रवर्ग | सविस्तर पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ८ |
| १ | ५/२०२२ | श्री.शिंपी परमेश्वर राजेंद्र | इमाव | खुला | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत नाशिक महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव अंतर्गत कार्यकारी अभियंता, गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, नाशिक अंतर्गत उप अभियंता, गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन उपविभाग क्र.१, संगमनेर. |
| २ | ११/२०२२ | श्री.काळे वैभव रामदास | आदुघ | खुला | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, उभारणी विभाग (विवयां) क्र.३, कोयनानगर, ता.पाटण, जि.सातारा. |
| ३ | १४/२०२२ | श्री.चिंता श्रीकांत मनोहर | विमाप्र | खुला | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, उभारणी विभाग (विवयां) क्र.३, कोयनानगर अंतर्गत उप अभियंता, उभारणी उपविभाग क्र.१ ब, कोयनानगर. |
| ४ | २४/२०२२ | श्री.भांगे ऋषिकेश गजानन | इमाव | इमाव | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत कोकण - १ महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, उभारणी विभाग (विवयां) क्र.१, अलोरे, ता.चिपळूण, जि.रत्नागिरी |
| ५ | ३९/२०२२ | श्रीमती सृष्टी सुभाष पाटील | इमाव महिला | इमाव महिला | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत नागपूर महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, नागपूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, विदर्भ जलविद्युत व उपसा सिंचन विभाग, भंडारा |
| ६ | ४१/२०२२ | श्री.गोणारकर अमोल रमेशराव | अजा अस्थीव्यंगता | अजा दिव्यांग अस्थीव्यंगता | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत नाशिक महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, तापी-गोदावरी जलविद्युत व उपसा सिंचन मंडळ, जळगांव अंतर्गत कार्यकारी अभियंता, तापी जलविद्युत व उपसा सिंचन विभाग क्र.२, धुळे. |
| ७ | ४९/२०२२ | श्री.दिपक गजानन गावंडे | खुला खेळाडू | खुला खेळाडू | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई अंतर्गत पुणे महसूल विभागातील अधीक्षक अभियंता, उभारणी मंडळ, कोल्हापूर अंतर्गत कार्यकारी अभियंता, उभारणी विभाग (विवयां) क्र.३, कोयनानगर अंतर्गत उप अभियंता, उभारणी उपविभाग क्र.१ ब, कोयनानगर. |

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: CN = ANIL VITTHAL DEOKATE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2024.08.07 15:04:49 +05'30'

(अनिल वि. देवकाते)
उप सचिव, महाराष्ट्र शासन